# छोटी लाल ट्रेन



लेखक: बेनेडिक्ट ब्लॅथ्वेट

# छोटी लाल ट्रेन



मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



*डफी* हा छोट्या लाल ट्रेनचा ड्रायव्हर होता आणि *जॅक* गार्ड. दोघे गार्डच्या डब्यात बसून चहाचे घुटके घेत होते. तेव्हाच एक मोठी लॉरी रेल्वेरुळाच्या बाजूने गेली. “काही कामधंदा नाही का तुम्हाला, मित्रांनो?” लॉरी ड्रायव्हर डफीवर खेकसला. “त्यात काही नवलही नाही म्हणा! तुमची ट्रेन आता जुनाट आणि खटारा झालीय. काही कामाची राहिली नाहीये ती. तिला म्युझियममध्ये ठेवा, नाहीतर भंगारात टाकून द्या.”





पण डफीला छोटी लाल ट्रेन कधीच जुनाट आणि भंगार वाटली नाही.



त्याचवेळी डफी आणि जॅककडे तीन अनाहूत पाहुणे आले.

“थंडीच्या दिवसात माझं फर्निचर भरपूर विकलं जातं. पण आता ते बंदरात अडकून पडलंय,” शोरुमचा मॅनेजर म्हणाला.

“मला काँक्रिटमध्ये मिसळायला खाणीतून वाळू काढून आणायचीय,” सिमेंट कारखान्याचा अधिकारी म्हणाला.

“मला जंगलातून लाकडं आणायचीयत,” लाकूड कापण्याच्या कारखान्याचा मालक म्हणाला.

“पण तुम्ही नेहमीसारखं लॉरीमधून का आणत नाही?” डफीने त्याच्या पाहुण्यांना विचारले.

“भयंकर ट्रॅफिक आहे,” त्यांनी तक्रारीचा सूर लावला, “रस्ते खराब आहेत, ट्रॅफिक दिवे नादुरुस्त आहेत. तुम्ही मदत केलीत तर छोट्या लाल ट्रेनने जुन्या रुळांवरून बंदरावर जाऊन आमचा माल आणता येईल.”



“आम्ही तुम्हाला शक्य ती मदत करू,” डफी म्हणाला.
“तेलाचा डबा सोबत घे, जॅक!”

छोटी लाल ट्रेन पूर्ण वेगाने निघाली.

झुक, झुक, झुक, झुक!




“लॉऱ्या का अडकल्यायत ते दिसतंय मला,” डफी गार्डच्या डब्यात बसलेल्या जॅकला म्हणाला.



छोटी लाल ट्रेन बंदरावर पोहोचली. दोघे जुने रूळ कुठे दिसतात का, ते पाहू लागले.

“ते बघ, दिसले जुने रूळ!” ओरडत जॅक खाली उतरला. “तिथे माल नेण्यासाठी बऱ्याच वाघिणीसुद्धा आहेत.” डफीने काही वाघिणी छोट्या लाल ट्रेनच्या इंजिनामागे जोडल्या.





जुन्या रेल्वे रूळांवरून ते थेट बंदरावर, माल उचलणाऱ्या आणि ठेवणाऱ्या एका विशाल क्रेनखाली पोहोचले.



क्रेनने फर्निचर लादलेले जहाजावरील डबे
उचलून तीन रेल्वे वाघिणींवर अलगद ठेवले.



सर्व वाघिणींमध्ये माल लादल्यावर छोटी लाल ट्रेन जुन्या रुळांवरून नव्या रुळांवर धावू लागली.
“आता खाणीकडे जाऊ,” डफी म्हणाला.
झुक-झुक-झुक-झुक.... आवाज करत छोटी लाल ट्रेन पुढे पुढे चालली.
गंज लागलेली ट्रेनची चाके रुळांवर वेगाने फिरू लागली. कच....कच.....कच...कच....!



खाणीत पोहोचल्यावर जुने रूळ धुळीच्या खाली झाकले गेले आहेत, असे त्यांना दिसले. “इथे बऱ्याच जुन्या वाळूच्या वाघिणी आहेत,” जॅक म्हणाला. “चल, त्यांना ट्रेनला जोडूया.”





मग खाणीतल्या एका मोठ्या पात्रातून वाळू पडून त्या वाघिणी काठोकाठ भरल्या.



“आता जंगलात जाऊ,” डफी म्हणाला. “आपली छोटी लाल ट्रेन या सगळ्या वाघिणी ओढून नेण्याएवढी मजबूत आहे.”

झुक, झुक, झुक, झुक....छोट्या लाल ट्रेनच्या नळकांड्यातून धूर निघाला.

कच....वाघिणींची गंज लागलेली चाके रुळांवर घासत, किंचाळत फिरू लागली.



काही वेळाने ते जंगलात पोहोचले. तिथे रेल्वेरूळ आणि काही वाघिणी झुडपांनी झाकल्या गेल्या होत्या. डफीने छोटी लाल ट्रेन जुन्या रुळांवर नेली आणि त्या वाघिणी आपल्या इंजिनला जोडल्या.



जंगलातील मजुरांनी यंत्राच्या मदतीने झाडांचे लांबलांब ओंडके वाघिणींवर लादले. आता छोटी लाल ट्रेन परतीच्या प्रवासला सज्ज झाली.

“चल, आता परतूया,” डफी म्हणाला.





छोट्या लाल ट्रेनची चाके फिरू लागली, तिच्या चिमणीतून धूर निघू लागला आणि नळकांड्यातून वाफ बाहेर पडू लागली.

झुक, झुक, झुक, झुक....

जंगलातील ओंडके, खाणीतील वाळू आणि जहाजातील फर्निचर लादलेल्या वाघिणींची लांबलचक रांग घेऊन छोटी लाल ट्रेन मुख्य रुळांवरून हळूहळू पुढे चालू लागली.

या वाघिणींच्या सर्वात मागे होता जॅकचा गार्डचा डबा.

फूं....फूं....फूं.... छोट्या लाल ट्रेनने शिट्टी वाजवली.

डफीने लॉरीच्या ड्रायव्हरना बघून हात हलवला. लॉऱ्या अद्याप ट्रॅफिकमध्येच अडकल्या होत्या.









डफी आणि जॅक परतल्यावर शोरुम मॅनेजर, सिमेंट कारखान्याचा अधिकारी आणि लाकडाच्या कारखान्याचा मालक यांनी आपापला माल उतरवून घेतला. ते म्हणाले, “धन्यवाद, छोटी लाल ट्रेन! तू मदत केली नसतीस तर आमचं काम खोळंबलं असतं.”



डफी आणि जॅक यांनी वाघिणींची साफसफाई करून त्यांच्या चाकांमध्ये तेल घातले.

मग त्यांनी छोट्या लाल ट्रेनवर लाल रंगाचा नवा चमकदार थर दिला.

“आता आम्ही नवं काम करायला सज्ज आहोत,” डफी अभिमानाने म्हणाला.

“शाब्बास, छोटी लाल ट्रेन! आज तू फार मोठं काम केलंस.”

समाप्त